2010122318354001

विकास योजना-मिरज
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,
१९६६ चे कलम-३७(२) अन्वये फेरबदल
मंजूर करणेबाबत.
आ.क्र.९ आठवडा बाजार.

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक-टिपीएस-२००९/१७६/प्र.क्र.१९९४/२००९/नवि-१३
दिनांक :-२४.११.२०१०

शासन निर्णय :- सोबतची शासकिय अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रा मध्ये प्रसिद्ध करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(प्र.ल. गोहिल)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
आयुक्त, सांगली-मिरज-कुपवाड महानगरपालिका, सांगली.
सहाय्यक संचालक नगर रचना, सांगली शाखा, सांगली.
व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिद्ध करुन त्याच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे, आयुक्त सांगली-मिरज-कुपवाड महानगरपालिका, सांगली, सहाय्यक संचालक नगर रचना, सांगली शाखा, सांगली, यांना पाठवाव्यात)

कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, सदर अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिद्ध करावी.

निवडनस्ती (नवि-१३).

अधिसूचना

महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :२४.११.२०१०

क्र.टिपीएस-२००९/१७६/प्र.क्र.१९९४/२००९/नवि-१३

महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६

ज्याअर्थी, मिरज शहराची विकास योजना (यापुढे "उक्त विकास योजना" असे उल्लेखिलेली) शासनाचे नगर विकास आणि सार्वजनिक आरोग्य विभागाकडील अधिसूचना क्र.टिपीएस-२०७८/२३६४ ब/नवि-५, दिनांक २६.५.१९७९ रोजी (यापूढे उक्त अधिसूचना म्हणून संबोधिलेली) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ (यापुढे उक्त अधिनियम म्हणून संबोधलेला) चे कलम ३१(१) अन्वये मंजूर झाली असून ती दिनांक ३०.०६.१९७९ पासून अंमलात आलेली आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेमध्ये आ.क्र.९ हे आठवडा बाजार यासाठी आरक्षीत आहे (यापूढे ज्याचा उल्लेख "उक्त आरक्षण" असा केला आहे);

आणि ज्याअर्थी, सांगली, मिरज व कुपवाड महानगरपालिकेने उक्त अधिनियमाचे कलम ३७(१) अनुसार विहीत वैधानिक कार्यवाही पूर्ण करुन उक्त विकास योजनेतील उक्त आरक्षणापैकी अस्तित्वातील घरे असलेले क्षेत्र (नकाशावर दर्शविल्याप्रमाणे) उक्त आरक्षणातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबतचा फेरबदलाचा प्रस्ताव (यापूढे ज्याचा उल्लेख "उक्त फेरबदल" म्हणून केला आहे) दि.२.१.२००८ चे पत्र क्र.मनपा/मिरज/नर-७/७८२/२००८-०९ अन्वये मंजूरीसाठी शासनास सादर केला आहे;

आणि ज्याअर्थी, शासनाने संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी सल्लामसलत केल्यानंतर व आवश्यक ती चौकशी केल्यानंतर उक्त फेरबदलाचा प्रस्ताव मंजूर करणे आवश्यक आहे, अशी शासनाची खात्री झाली आहे;

आणि त्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम ३७ चे पोट कलम (२) अन्वये प्रदत्त असलेल्या अधिकाराचा वापर करुन महाराष्ट्र शासन याद्वारे उक्त फेरबदल प्रस्ताव मंजूर करीत आहे आणि त्यासाठी विकास योजना मंजूरीच्या उक्त

अधिसूचनेमध्ये पुढील बदल करण्यात येत आहे. अधिसूचनेच्या फेरबदलाच्या अनुसुचिमध्ये शेवटच्या नोंदीनंतर खालीलप्रमाणे नवीन नोंद समाविष्ट करण्यात येत आहे:-

- <u>नोंद</u> -

"आ.क्र.९ आठवडा बाजार या आरक्षणापैकीच्या जागेवरील अस्तित्वातील घरे असलेले क्षेत्र (नकाशावर दर्शविलेप्रमाणे) उक्त आरक्षणातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करण्यात येत आहे".

<u>टिप</u> -

अ) उक्त मंजूर फेरबदलाचा नकाशा एक महिन्याकरीता नागरिकांच्या अवलोकनासाठी सांगली-मिरज-कुपवाड महानगरपालिकेच्या कार्यालयामध्ये कार्यालयीन वेळेत ठेवण्यात आला आहे.

ब) सदरहू अधिसूचना शासनाच्या www.urban.maharashtra.gov.in वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(प्र.ल. गोहिल)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र राज्य

**NOTIFICATION**
**Government of Maharashtra**
**URBAN DEVELOPMENT DEPARTMENT**
**MANTRALAYA, MUMBAI-32**

**Dated : 24.11.2010**

No.TPS-2009/176/CR.1994/2009/UD-13

Maharashtra Regional & Town Planning Act 1966

Whereas, the Government of Maharashtra in Urban Development and Public Health Department has sanctioned the Development Plan of Miraj (hereinafter referred to as "the said Development Plan) vide Notification No.TPS-2078/2364-B/UD-5, dt.26th May, 1979 (hereinafter referred to as "the said Notification) under section 31(1) of Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (hereinafter referred to as "the said Act") and came into force from 30th June, 1979;

And whereas, as per proposals of the said Development Plan the Site No.9 is reserved for Weekly Market (hereinafter referred to as the said reservation);

And whereas, the Sangli Miraj Kupvad Municipal corporation, after completing the procedure laid down under section 37(1) of the said Act, has submitted a proposal of modification to the said Development Plan vide its Marathi letter No. मनपा/मिरज/नर-७/७८२/२००८-०९, dated 2.1.2009 so as to delete the area under existing built up properties from the said reservation and to include in residential zone (as shown as plan)(hereinafter referred to as "the said modification");

And Whereas, after making necessary enquiries and after consulting the Director of Town Planning Maharashtra state, Pune is of the opinion that the said modification needs to be sanctiond;

Now, therefore, in exercise of the powers conferred under sub section (2) of section 37 of the said Act, the Government of Maharashtra hereby sanctions the said modification proposal and for that purpose amends the said notification as mentioned below:-

"In the schedule of modifications appended to the said notification sanctioning the said Development Plan, after the last entry the following new entry shall be added viz :-

**- NEW ENTRY -**

"The area under existing built up properties is deleted from Site No.9 Weekly Market and included in residential Zone (as shown on plan)".

**Note** :-

A) The plan showing the aforesaid modification is kept open for inspection for the public during office hours on all working days in the office of the Sangli Miraj Kupwad Municipal Corporation.

B) This notification is also published on Goverment web site www.urban.maharashtra.gov.in

By order and in the name of Governor of Maharashtra.

(Pradeep Gohil)
Section Officer.